अर्थसंकल्पिय अनुदान सन २०२०-२१
" २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य)
(२२१५ १८८१) " मागणी क्रमांक वाय-२

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९०/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ११ जून, २०२०

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि.१ एप्रिल २०२०
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०
३. शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि., क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.९०/पापु-२३, दि. ३० एप्रिल, २०२०

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२०-२१ करिता ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रुपये २४४.०० कोटी व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये १०.१३ कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. तथापि वित्त विभागाने कोरोना विषाणुमुळे उद्भवलेल्या महारामीच्या परिस्थितीत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य खर्चासाठी अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी केवळ रुपये २४.४० कोटी इतके लेखाअनुदान शासन परिपत्रक दिनांक

१६.४.२०२० अन्वये अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिले होते. सदर अनुदान जिल्हा परिषदांना या विभागाच्या शासन निर्णय दिनांक ३०.४.२०२० अन्वये वितरीत करण्यात आले आहे.

२. तथापि जिल्हा परिषदांना सदर वेतन निधी अपुरा पडत असल्याने संबंधित जिल्हा परिषदांचा सन २०२०-२१ मधील कोषवाहीनीवरील एकूण वेतनखर्च विचारात घेऊन जिल्हा परिषदांना पुढील वेतन खर्चासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)" या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रुपये २२,४०,००,०००/- (अक्षरी रुपये बावीस कोटी चाळीस लाख फक्त ) इतके अनुदान संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६२/ कोषा प्रशा-५, दिनांक १ एप्रिल, २०२० मध्ये नमूद कालावधीसाठी त्यात नमूद कार्यपद्धतीनुसार वेतन अदा करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. कोव्हीड-१९ मुळे निर्माण झालेल्या आरोग्य व आर्थिक आपत्तीवर मात करण्याच्या दृष्टीने राज्याची एकंदर आर्थिक परिस्थिती विचारात घेता, खर्चात काटकसर करणे तसेच काही खर्च पुढे ढकलणे गरजेचे आहे.

३. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा

परिषदांनी नोंद घ्यावी. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)" ३६ सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१११५०६५१८९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.06.11 17:19:38 +05'30'

**चेतन निकम**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. विभागीय आयुक्त,
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व

५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१२. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१३. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४११)
१४. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१५. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१६. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

## विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-१४२०/प्र.क्र.९०/पापु-२३, दिनांक ११ जून, २०२० सोबतचे सहपत्र

| मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने (स्थानिक क्षेत्र) (०१) (०५) नियमित आस्थापना (२२१५१८८१)" | | | |
|---|---|---|---|
| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०२०-२१ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत अनुदान | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५ १८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| २ | पालघर | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |
| ३ | रायगड | ५५००००० | रूपये पंचावन्न लाख फक्त |
| ४ | रत्नागिरी | ८५००००० | रूपये पंच्याऐंशी लाख फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| ६ | नाशिक | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| ७ | धुळे | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ९ | जळगांव | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| १० | अहमदनगर | ७५००००० | रूपये पंच्याहत्तर लाख फक्त |
| ११ | पुणे | ८०००००० | रूपये ऐंशी लाख फक्त |
| १२ | सातारा | १००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| १३ | सांगली | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| १४ | सोलापूर | ८०००००० | रूपये ऐंशी लाख फक्त |
| १५ | कोल्हापूर | १००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| १६ | औरंगाबाद | ९०००००० | रूपये नव्वद लाख फक्त |
| १७ | जालना | ८५००००० | रूपये पंच्याऐंशी लाख फक्त |
| १८ | परभणी | ६५००००० | रूपये पासष्ठ लाख फक्त |
| १९ | हिंगोली | ४५००००० | रूपये पंचेचाळीस लाख फक्त |
| २० | बीड | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| २१ | नांदेड | ८०००००० | रूपये ऐंशी लाख फक्त |
| २२ | उस्मानाबाद | ७०००००० | रूपये सत्तर लाख फक्त |
| २३ | लातूर | ९५००००० | रूपये पंच्याण्णव लाख फक्त |
| २४ | बुलढाणा | ८५००००० | रूपये पंच्याऐंशी लाख फक्त |
| २५ | अकोला | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| २६ | वाशिम | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |

| | | | |
|---|---|---|---|
| २७ | अमरावती | १००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| २८ | यवतमाळ | ५५०००००० | रूपये पंचावन्न लाख फक्त |
| २९ | वर्धा | ४५०००००० | रूपये पंचेचाळीस लाख फक्त |
| ३० | नागपूर | ६५०००००० | रूपये पासष्ठ लाख फक्त |
| ३१ | भंडारा | ४५०००००० | रूपये पंचेचाळीस लाख फक्त |
| ३२ | गोंदिया | ४५०००००० | रूपये पंचेचाळीस लाख फक्त |
| ३३ | चंद्रपूर | ६०००००० | रूपये साठ लाख फक्त |
| ३४ | गडचिरोली | ४५०००००० | रूपये पंचेचाळीस लाख फक्त |
| **एकूण** | | २२४०००००० | रूपये बावीस कोटी चाळीस लाख फक्त |

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.06.11 17:20:17 +05'30'

(चेतन निकम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन